**राज्यातील पुणे, नाशिक, छत्रपती संभाजीनगर आणि नागपूर या महानगर प्रदेश विकास प्राधिकरणांच्या हद्दीतील शासकीय जमिनी त्या त्या प्राधिकरणांच्या नावावर वर्ग करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांक: एमआरडी-३३२४/प्र.क्र.२१८/नवि-३५(नवि-७)**
**मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२**
**दिनांक : ०२ मे, २०२५.**

प्रस्तावना :

महाराष्ट्र महानगर प्रदेश विकास प्राधिकरण अधिनियम, २०१६ (२०१७ चा महा.३) चे कलम ३ चे उप-कलम (१) अन्वये पुणे महानगर प्रदेश विकास प्राधिकरण, पुणे या प्राधिकरणांची स्थापना अधिसूचना दि.११/०७/२०१६ अन्वये; नाशिक महानगर प्रदेश विकास प्राधिकरण, नाशिक आणि छत्रपती संभाजीनगर महानगर प्रदेश विकास प्राधिकरण, छत्रपती संभाजीनगर या प्राधिकरणांची स्थापना अधिसूचना दि. ०१ मार्च, २०१७ अन्वये तसेच नागपूर महानगर प्रदेश विकास प्राधिकरण, नागपूर या प्राधिकरणाची स्थापना अधिसूचना दि.०४ मार्च, २०१७ अन्वये करण्यात आली आहे.

महाराष्ट्र महानगर प्रदेश विकास प्राधिकरण अधिनियम, २०१६ मधील प्रकरण-५ मधील कलम २० (४) (क) मध्ये ,"***महानगर प्रदेशातील सर्व भारांपासून मुक्त अशा शासकीय जमिनी, राज्य शासन त्यास योग्य वाटतील अशा अटी व शर्तीवर प्राधिकरणाला उपलब्ध करुन देईल आणि प्राधिकरण, त्या प्रदेशाला त्या त्या वेळी लागू असलेल्या मंजूर प्रादेशिक योजनेनुसार किंवा विकास योजनेनुसार, पायाभूत सुविधांची तरतूद करण्यासाठी निधी उभारण्याचा स्रोत म्हणून जमिनींचा वापर करील.***"अशी तरतुद आहे. सदर तरतुदीच्या अनुषंगाने महानगर प्रदेश विकास प्राधिकरणाच्या कार्यक्षेत्रातील शासकीय जमिनी संबंधित प्राधिकरणाकडे वर्ग करण्याची विनंती पुणे, नाशिक, छत्रपती संभाजीनगर व नागपूर या प्राधिकरणांनी शासनास केली होती. सदरच्या प्रस्तावास शासनाने मान्यता दिली आहे.त्यानुषंगाने, शासनाने खालीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय :-**

०१. पुणे महानगर प्रदेश विकास प्राधिकरण, पुणे; नाशिक महानगर प्रदेश विकास प्राधिकरण, नाशिक; छत्रपती संभाजीनगर महानगर प्रदेश विकास प्राधिकरण, छत्रपती संभाजीनगर तसेच नागपूर महानगर प्रदेश विकास प्राधिकरण, नागपूर या प्राधिकरणांना महाराष्ट्र महानगर प्रदेश विकास प्राधिकरण अधिनियम, २०१६ च्या प्रकरण-५ अंतर्गत कलम २० (४) (क) मधील तरतूदीनुसार या शासन निर्णयासोबत जोडण्यात आलेल्या विवरणपत्र - अ मध्ये नमूद परिक्षेत्रातील शासकीय जमिनी महसूल विभागाकडून (संबंधित जिल्हाधिकारी) संबंधित महानगर प्रदेश विकास

प्राधिकरणांना मुलभूत सुविधा निर्माण करणे व त्यापासून निधीची उभारणी करण्याकरिता विनामूल्य हस्तांतरीत करण्यास खालील अटी व शर्तीच्या अधीन राहून शासनाची मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

अ) पुणे, नाशिक, छत्रपती संभाजीनगर व नागपूर या महानगर प्रदेश विकास प्राधिकरणांस हस्तांतरीत होणाऱ्या जमिनीची विल्हेवाट (Land Disposal) ही संबंधित प्राधिकरणांनी विहित जमीन विल्हेवाट नियमावलीनुसार करण्यास मान्यता देण्यात येत आहे. सदरहू प्राधिकरणांनी राज्य शासनाच्या मान्यतेने जमिनींच्या विल्हेवाटीसंदर्भातील जमीन विल्हेवाट नियमावली तात्काळ तयार करावी.

ब) प्राधिकरणांकडे हस्तांतरीत होणा-या जमिनी विकसित करताना राज्यशासन/जिल्हाधिकारी यांचे ना हरकत घेण्याची आवश्यकता नसेल.

क) शासकीय जमिनी प्राधिकरणाकडे वर्ग केल्यानंतर महानगर प्रदेश विकास प्राधिकरणांच्या तसेच महसूल व वन विभागाच्या (जिल्हाधिकारी) स्तरावर जमिनीबाबत व त्याच्या केलेल्या वापराबाबतचा स्वतंत्र अभिलेख ठेवणे आवश्यक राहील. सदर अभिलेखांचे डिजीटायझेशन करण्यात यावे.

ड) सदरहू शासन निर्णयाद्वारे प्राधिकरणांकडे हस्तांतरीत होणाऱ्या गायराण/गुरचरण/देवस्थान व वन जमिनींचा समावेश असल्यास अश्या जमिनीबाबत मा. सर्वोच्च न्यायालय व मा. उच्च न्यायालय यांच्या निर्णयानुसार कार्यवाही करण्याची दक्षता घेण्यात यावी.

इ) महानगर प्रदेश विकास प्राधिकरणांकडे हस्तांतरीत होणाऱ्या जमिनीमध्ये काही जमिनी या स्थानिक स्वराज्य संस्थाकडे या संबंधित ग्रामपंचायत/जिल्हा परिषद यांच्याकडे निहीत असल्यास सदर जमिनींचा विकास करण्यापूर्वी संबंधित ग्रामपंचायत/जिल्हा परिषद यांची परवानगी/ठराव घेणे महानगर प्रदेश विकास प्राधिकरणांना अनिवार्य राहील.

**०२.** सदरहू शासन निर्णय पुणे, नाशिक, छत्रपती संभाजीनगर व नागपुर या महानगर प्रदेश विकास प्राधिकरणांच्या स्थापनेसंदर्भात अनुक्रमे दि.११ जुलै, २०१६, दि.१ मार्च, २०१७, दि.१ मार्च, २०१७ व दि. ४ मार्च, २०१७ अन्वये निर्गमित करण्यात आलेल्या अधिसुचनेने सोबत जोडलेल्या अनूसुचीमधील विनिर्दिष्ट क्षेत्रामधील शासकीय जमिनी याकरीता लागू राहील तसेच शासनामार्फत वेळोवेळी महानगर विकास प्राधिकरणामध्ये समाविष्ट होतील अशा क्षेत्राकरीता लागू राहील.

**०३.** प्राधिकरणांकडे हस्तांतरीत होणा-या शासकीय जमिनींवर सद्यस्थितीत अतिक्रमण असल्यास अतिक्रमण काढून अतिक्रमण मुक्त जमीन हस्तांतर करण्याची जबाबदारी संबंधीत जिल्हाधिकारी यांची राहील.

**०४.** प्राधिकरणांकडे हस्तांतरीत होणा-या शासकीय जमिनी अतिक्रमणमुक्त राहतील याची दक्षता संबंधीत प्राधिकरणाने घ्यावी. तसेच सदरील जमिन क्षेत्राचे राखण करणे तसेच जमिनींवर कोणत्याही प्रकाराचे अतिक्रमण होवू नये यासाठी दक्षता संबंधीत प्राधिकरणाकडून घेण्यात यावी व त्यासाठी आवश्यक यंत्रणा/व्यवस्था निर्माण करण्यात यावी.

**०५.** सदरहू शासन निर्णय महसूल व वन विभागाचा अनौ. संदर्भ क्र.२९९/ज-१, दि.१३/०२/२०२५, वित्त विभाग अनौ. संदर्भ क्र. २१८/व्यय-३, दि. २६/०३/२०२५ आणि मा.मंत्रिमंडळाने दि.०८/०४/२०२५ रोजीच्या बैठकीत घेतलेल्या निर्णयास अनुसरून निर्गमित करण्यात येत आहे.

**०६.** सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२५०५०२१६२२३८२९२५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SUBRAO NARAYAN SHINDE

Digitally signed by SUBRAO NARAYAN SHINDE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=URBAN DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=ffa7b5a27faed7560194e6272933cfa60dca1eb8ab54859eae7920c9d0d1f622, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=E5BB5862D0E131A274D92F7A1ACEF953E01301C1B0FB615DC6CCE4812BDED257, cn=SUBRAO NARAYAN SHINDE
Date: 2025.05.02 16:23:52 +05'30'

**(सुबराव ना. शिंदे)**

**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा. राज्यपाल, महाराष्ट्र राज्य, यांचे सचिव.
२. मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
३. मा. उपमुख्यमंत्री यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
४. मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
५. अपर मुख्य सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
६. अपर मुख्य सचिव (महसूल), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
७. अपर मुख्य सचिव, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
८. अपर मुख्य सचिव (वित्त), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
९. अपर मुख्य सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
१०. अपर मुख्य सचिव (नवि-१), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
११. अपर मुख्य सचिव, गृहनिर्माण विभाग , मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
१२. अपर मुख्य सचिव (परिवहन), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
१३. प्रधान सचिव (नवि-२), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
१४. प्रधान सचिव (उद्योग) उद्योग ऊर्जा व कामगार विभाग , मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
१५. प्रधान सचिव (ऊर्जा) उद्योग ऊर्जा व कामगार विभाग , मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
१६. प्रधान सचिव, पर्यावरण विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
१७. प्रधान सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
१८. विभागीय आयुक्त, पुणे/नागपूर/नाशिक/छत्रपती संभाजीनगर विभाग
१९. महानगर आयुक्त, महानगर प्रदेश विकास प्राधिकरण, पुणे/नागपूर/नाशिक/छत्रपती संभाजीनगर
२०. नोंदणी महानिरिक्षक व नियंत्रक मुद्रांक नियंत्रक, पुणे
२१. जिल्हाधिकारी पुणे/नागपूर/नाशिक/छत्रपती संभाजीनगर.
२२. आयुक्त, पुणे/पिंपरी चिंचवड/नागपूर/नाशिक/छत्रपती संभाजीनगर महानगरपालिका
२३. निवड नस्ती (नवि-७/ नवि-३५).

## नगर विकास विभाग,शासन निर्णय क्रमांक: एमआरडी-३३२४/प्र.क्र.२१८/नवि-३५(नवि-७) दिनांक : ०२ मे, २०२५.

### विवरणपत्र अ

महाराष्ट्र महानगर प्रदेश विकास प्राधिकरण अधिनियम, २०१६ (२०१७ चा महा.३) चे कलम ३ चे उप-कलम (१) अन्वये, अधिसूचना दि.११/०७/२०१६ अन्वये पुणे महानगर प्रदेश विकास प्राधिकरण, पुणे या प्राधिकरणाची चतु:सिमा दर्शविणारी अनूसुचीनुसार पुणे प्राधिकरण क्षेत्रातील तालुकानिहाय गावांमधील शासकीय जमिन हस्तांतरणाचा तपशिल :-

| अ.क्र. | तहसिल कार्यालय | शासकीय जमिन उपलब्ध असलेल्या गावांची संख्या | वाटपासाठी उपलब्ध जमिनीचे क्षेत्र (हे.आर.) |
|---|---|---|---|
| १ | हवेली | २६ | ३७२.७७ |
| २ | मुळशी | १७ | ९५.९१ |
| ३ | दौंड | ४ | ८.४९ |
| ४ | शिरुर | २० | १११.७ |
| ५ | पुरंदर | ७ | २२१.७६ |
| ६ | भोर | १० | २२.३० |
| ७ | खेड | ४५ | ७१४.०६ |
| ८ | मावळ | ४५ | ३३१.७७ |
| | | **एकुण** | **१८७८.७६** |

महाराष्ट्र महानगर प्रदेश विकास प्राधिकरण अधिनियम, २०१६ (२०१७ चा महा.३) चे उप-कलम (१) अन्वये, अधिसूचना दि. ०१ मार्च, २०१७ अन्वये नाशिक महानगर प्रदेश विकास प्राधिकरण, नाशिक या प्राधिकरणाची चतु:सिमा दर्शविणारी अनूसुचीनुसार नाशिक प्राधिकरण क्षेत्रातील तालुकानिहाय गावांमधील शासकीय जमिन हस्तांतरणाचा तपशिल :-

| अ.क्र. | तहसिल कार्यालय | शासकीय जमिन उपलब्ध असलेल्या गावांची संख्या | वाटपासाठी उपलब्ध जमिनीचे क्षेत्र (हे.आर.) |
|---|---|---|---|
| १ | नाशिक | ४५ | ११७७१.५६ |
| २ | त्र्यंबकेश्वर | २३ | २७७.६२५ |
| ३ | इगतपुरी | ३३ | ३०८.३३३४ |
| ४ | दिंडोरी | १९ | २५२.२९०२ |
| ५ | सिन्नर | २६ | ५२३.०६१७ |
| ६ | निफाड | ४४ | ५११.६३ |
| | | **एकुण** | **१३६४४.५००३** |

महाराष्ट्र महानगर प्रदेश विकास प्राधिकरण अधिनियम, २०१६ (२०१७ चा महा.३) चे उप-कलम (१) अन्वये, अधिसूचना दि. ०१ मार्च, २०१७ अन्वये छत्रपती संभाजीनगर महानगर प्रदेश विकास प्राधिकरण, छत्रपती संभाजीनगर या प्राधिकरणाची चतु:सिमा दर्शविणारी अनूसुचीनुसार छत्रपती संभाजीनगर प्राधिकरण क्षेत्रातील तालुकानिहाय गावांमधील शासकीय जमिन हस्तांतरणाचा तपशिल :-

| **अ.क्र.** | **तहसिल कार्यालय** | **शासकीय जमिन उपलब्ध असलेल्या गावांची संख्या** | **वाटपासाठी उपलब्ध जमिनीचे क्षेत्र (हे.आर.)** |
|---|---|---|---|
| १. | खुलताबाद | १ | ३२.०७ |
| २. | छत्रपती संभाजीनगर ग्रामीण | ३ | ३६.४९ |
| ३. | गंगापूर | ७ | ९९.९२ |
| ४. | फुलंब्री | १४ | २४०.४८ |
| | | **एकुण** | **४०८.९६** |

महाराष्ट्र महानगर प्रदेश विकास प्राधिकरण अधिनियम, २०१६ (२०१७ चा महा.३) चे कलम ३ चे उप-कलम (१) अन्वये, अधिसूचना दि.०४ मार्च, २०१७ अन्वये नागपूर महानगर प्रदेश विकास प्राधिकरण, नागपूर या प्राधिकरणाची चतु:सिमा दर्शविणारी अनूसुचीनुसार नागपुर प्राधिकरण क्षेत्रातील तालुकानिहाय गावांमधील शासकीय जमिन हस्तांतरणाचा तपशिल :-

| **अ.क्र.** | **तहसिल कार्यालय** | **शासकीय जमिन उपलब्ध असलेल्या गावांची संख्या** | **वाटपासाठी उपलब्ध जमिनीचे क्षेत्र (हे.आर.)** |
|---|---|---|---|
| १ | नागपूर ग्रामीण | ६६ | १२०५.९५ |
| २ | हिंगणा | ४८ | २९२७.७१ |
| ३ | कामठी | ४४ | ४६९.३५ |
| ४ | मौदा | ७३ | ६८५.१९ |
| ५ | कळमेश्वर | १७ | ४२८.५ |
| ६ | सावनेर | २० | २८४.२२ |
| ७ | कुही | ७ | ३९.८४ |
| ८ | उमरेड | ११ | २९४.६८ |
| ९ | पारशिवनी | ७२ | ८३२.१८ |
| | | **एकुण** | **७१६७.६२** |